**मौजे शिरोडा वेळागर, ता. वेंगुर्ला, जि. सिंधुदुर्ग येथे पंचतारांकित पर्यटन केंद्र उभारण्याकरीता मे. इंडियन हॉटेल्स कंपनी लि. (ताज ग्रुप) यांना खाजगीरित्या संपादित आणि शासकीय जमीन मिळून एकूण ५४.४० हे.आर.जमीन दिर्घमुदतीच्या भाडेपट्टयाने देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक टीडीसी २०१४/प्र.क्र.१९६/पर्यटन,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- २३ जुलै, २०२०.

वाचा- शासन निर्णय, एलएनडी-१०९३/प्र.क्र. ५५/ज-१, दि.०३.०६.१९९३
शासन निर्णय, एलएनडी-१०९३/प्र.क्र.५५/ज-१, दि.१७.०२.१९९५

प्रस्तावना :-

मे. इंडियन हॉटेल्स कंपनी लि. यांनी मौजे शिरोडा, जि. सिंधुदुर्ग येथील बीच रिसॉर्ट प्रकल्पासाठी शासनाने जमीन संपादित करुन महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळामार्फत दीर्घ मुदतीच्या भाडेपट्टयाने कंपनीस द्यावी, असा प्रस्ताव शासनास सादर केला होता. कंपनीच्या प्रस्तावानुसार महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांच्यामार्फत संपादित केलेली खाजगी जमीन तसेच महसूल व वन विभागाने त्यांच्या पत्र क्र.जमीन-२९१५/अ/प्र.क्र.४३९/ज-४अ, दिनांक ३.११.२०१६ अन्वये पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागास पर्यटन विकासासाठी महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम ३१ व ४० तसेच महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनींची विल्हेवाट करणे) नियम, १९७१ मधील नियम ५ व ६ अन्वये भोगाधिकार मूल्यरहित व महसूल मुक्त रितीने कब्जे हक्काने प्रदान केलेली मौजे शिरोडा (वेळागर), ता. वेंगुर्ला, जि. सिंधुदुर्ग येथील सर्व्हे नं.३९, हिस्सा नं.१अ, क्षेत्र,१२-७६.८० हे. आर. ही शासकीय जमीन मे. इंडियन हॉटेल्स कंपनी लि. यांना दिर्घ मुदतीच्या भाडेपट्टयाने देण्याचा प्रस्ताव शासनस्तरावर विचाराधीन होता. तसेच, त्याअनुषंगाने राज्य मंत्रीमंडळाच्या दि.९/६/२०२० रोजीच्या बैठकीत चर्चेअंती घेतलेल्या निर्णयानुसार क्षेत्रीय अधिकारी व प्राधिकारी यांना सविस्तर निर्देश देण्याकरिता सविस्तर शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

मौजे शिरोडा-वेळागर, जि. सिंधुदुर्ग येथील खाजगी संपदित जमीन व शासकीय जमीन मिळून **एकूण ५४.४० हे. आर** जमीन महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळामार्फत मे. इंडियन हॉटेल्स कंपंनी लि. यांना पर्यटन विकासासाठी भुईभाडे आकारुन दिर्घ मुदतीच्या भाडेपट्टयाने देण्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतले आहेत :-

**१.** महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने मौजे शिरोडा वेळागर, ता. वेंगुर्ला, जि. सिंधुदुर्ग येथील **एकूण ५२.६४.२० हे. आर** इतक्या खाजगी जमिनीचे जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांच्यामार्फत भूसंपादन केले आहे. खाजगी जमीन संपादित करण्यासाठीचा खर्च (जमिनीची किंमत + प्रशासकीय खर्च) मे. इंडियन हॉटेल्स कंपंनी लि. यांनी केला आहे. मे. इंडियन हॉटेल्स कंपनी लि. यांना सदर खाजगी जमिनीपैकी **४१.६३.२० हे. आर.** इतकी जमीन भुईभाडे आकारुन ९० वर्षाच्या दीर्घ मुदतीच्या कालावधीसाठी भाडेपट्टयाने प्रदान करण्यास महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**२.** महसूल व वन विभागाच्या शासन ज्ञापन क्र. जमीन -२९१५ अ/प्र.क्र.४३९/ज-४अ, दि.३ नोव्हेंबर, २०१६ अन्वये मौजे शिरोडा वेळागर, ता. वेंगुर्ला, जि. सिंधुदुर्ग येथील सर्व्हे क्र.३९, हिस्सा क्र.१ अ, क्षेत्र **१२-७६.८० हे. आर. ही** शासकीय जमीन महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६ चे कलम ३१ व ४० तसेच महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनींची विल्हेवाट करणे) नियम १९७१ मधील नियम ५ व ६ अन्वये पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागास पर्यटन विकासासाठी भोगाधिकार मूल्यरहित व महसूल मुक्त कब्जेहक्काने प्रदान करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

आता, पर्यटन विभागाकडून ही जमीन महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाला ९० वर्षाच्या कालावधीसाठी भाडेपट्टयाने प्रदान करण्यास व ती पुढे महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळामार्फत मे. इंडियन हॉटेल्स कंपनीला (उपरोक्त खाजगी जमिनीबरोबरच) ९० वर्षाच्या पोटभाड्याने (सब-लीज) देण्यास शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. एलएनडी-१०९३/ प्र.क्र.५५/ज-१, दि.३ जून, १९९३ व क्र. एलएनडी-१०९३/प्र.क्र..५५/ज-१, दि.१७ फेब्रुवारी, १९९५ मधील भाडेपट्टयाच्या कालावधीच्या तरतूदीस अपवाद करुन "एक अपवादात्मक बाब" म्हणून दिर्घ मुदतीचा "पोटभाडे करारनामा" करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. भाडेपट्टयाच्या कालावधीच्या या अटीव्यतिरिक्त शासन निर्णय, एलएनडी-१०९३/ प्र.क्र.५५/ज-१, दि.०३.०६.१९९३ व दि.१७.०२.१९९५ मधील अन्य अटी व शर्ती या प्रकरणी लागू राहतील.

४. पर्यटन विभागास दिलेल्या भोगाधिकार मूल्यरहित महसूल मुक्त दराने कब्जेहक्काने दिलेल्या शासकीय जमिनीवर मे. इंडियन हॉटेल्स कडून नियमानुसार "भाडेपट्टा करारनामा" करुन विहीत दराने भुईभाडे आकारण्यात येईल.

५. पर्यटन विभागास किंवा महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास सदर शासकीय जमीन मे. इंडियन हॉटेल्स कंपनी लि. यांना पोटभाड्याने देण्याव्यतिरिक्त शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय सदर जमीन वा तीचा कोणताही भाग किंवा तिच्यातील कोणतेही हितसंबंध विक्री करुन/देणगी देऊन/अदलाबदल करुन/ गहाण ठेऊन भाडेपट्टयाने देऊन/ खाजगी - सार्वजनिक सहभाग तत्त्वावर किंवा बाह्य यंत्रणाव्दारे किंवा अन्य प्रकारे हस्तांतरित करता येणार नाही. सदर जमिनीवर अथवा तिच्या कोणत्याही भागावर अन्य व्यक्ती संस्था / कंपनी इ. चे कोणत्याही प्रकारचे हक्क निर्माण होतील अशा

प्रकारे कोणतेही आर्थिक व्यवहार करता येणार नाहीत. तसेच शासनाच्या महसूल व वन विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय सदर जमिनीचे “पोटविभाजन अथवा एकत्रिकरण” करता येणार नाही.

६. सदर जमिनीवर संबंधित नियोजन प्राधिकरणाच्या विहित परवानगीने व मंजूर विकास नियंत्रण नियमावली नुसार विकास होणे बंधनकारक राहील. तसेच, या व्यतिरिक्त अन्य संबंधित विभाग शासकीय यंत्रणा यांची मान्यता / पूर्व परवानगी / ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करणेदेखील बंधनकारक असेल.

७. शासकीय जमिनी मंजूरी संबंधातील इतर नियमित अटी या प्रकरणी लागू राहतील. प्रस्तावित प्रयोजन आणि सुरक्षेच्या अनुषंगाने राज्य व केंद्र शासनाच्या विविध विभागानी वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश/ सूचना याप्रकरणी बंधनकारक राहतील.

८. वरील अटी / शर्तीपैकी कोणत्याही अटी / शर्तींच्या भंग केल्यास शर्तभंगाबाबत सदर शासकीय जमीन शासन जमा करण्याचा अधिकार शासनास राहील.

९. खाजगी संपादीत जमीन आणि शासकीय जमीन दोन भिन्न धारणाधिकाऱाचे असल्याने मे. इंडियन हॉटेल्स कंपनी लि. यांना दिर्घ मुदतीच्या भाडेपट्टयाने देताना महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ व संबंधित कंपनी यांच्या दरम्यान दोन स्वतंत्र करारनामे करण्यात येतील.

१०. हा शासन निर्णय, मा.राज्य मंत्रीमंडळाच्या दिनांक०९.०६.२०२० रोजीच्या बैठकीतील निर्णयास अनुसरुन, महसूल व वन विभागाच्या मान्यतेने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १११/२०२०/व्यय-१५, दि.१२.०३.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सकेतांक २०२००७२३१४३९०३६२२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Valsa R. Nair Singh

Digitally signed by Valsa R. Nair Singh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3d247d5da6bcbfdaa11e2c5849d798d7a4166b9383caae837665a4e85bf1dfb6, serialNumber=6b5f579e0e797ec0d52aa18f6730b8fbe3915a18f04069b941500b4f1ec297cc, cn=Valsa R. Nair Singh
Date: 2020.07.24 16:45:15 +05'30'

**(वल्सा नायर-सिंह)**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. मंत्री (पर्यटन), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. राज्यमंत्री (पर्यटन), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

५. मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधान परिषद), विधानभवन, मुंबई.
६. मा. मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई,
७. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई,
८. अपर मुख्य सचिव (महसूल), मंत्रालय, मुंबई,
९. प्रधान सचिव (पर्यटन), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, विधानभवन, मुंबई,
११.विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, सी.बी.डी. बेलापूर, नवीमुंबई,
१२.महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
१३.महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
१४.महालेखापाल (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा) मुंबई
१५.संचालक, पर्यटन संचालनालय, मुंबई,
१६.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
१७.जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग.
१८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१९.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२०.अधिक्षक भूमी अभिलेख, सिंधुदुर्ग.
२१.निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.

****